**<u>अपंगांसाठी सुयोग्य ठरविण्यात आलेल्या पदांबाबत.</u>**

**महाराष्ट्र शासन**
सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग
शासन निर्णय क्रमांक:न्यायाप्र-२००९/प्र.क्र.९/सुधार-३
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ३ ऑगस्ट, २०१०.

**संदर्भ:-** सम क्रमांकाचा दि.१३ ऑगस्ट,२००९ चा शासन निर्णय.

**<u>शासन निर्णय</u> :-** संदर्भाधिन शासन निर्णयान्वये सर्व शासकीय, निमशासकीय संस्थांमध्ये अपंगांसाठी पदनिश्चिती करताना अपंग व्यक्ती (समान संधी, हक्कांचे संरक्षण व संपूर्ण सहभाग ) अधिनियम १९९५ मध्ये नमुद केलेल्या अपंग प्रकारानुसार अपंगत्व असणा-या व्यक्तींसाठी पदे राखून ठेवण्याबाबतचा निर्णय शासनाने घेतलेला आहे. सदर शासन निर्णयाच्या अंमलबजावणीच्या कार्यवाहीबाबत संभ्रम निर्माण झाला आहे. त्यासंदर्भात स्पष्ट करण्यात येते की, अपंग व्यक्ती अधिनियम १९९५ मध्ये नमुद करण्याल आलेल्या अपंग प्रकारानुसार अपंग असणा-या व्यक्तींसाठी राखीव असलेली पदे भरण्याबाबत सद्या सुरू असलेल्या कार्यवाहीमधील पदे व भविष्यात भरण्यात येणारी पदे ही शासन निर्णय दि.१३ ऑगस्ट ,२००९ मध्ये नमुद करण्यात आलेल्या अपंग प्रकारानुसारच भरण्यात यावीत.

२. तसेच राज्यातील अपंग व्यक्तीना अपंगत्वाचे फायदे घेण्यासाठी आवश्यक असलेले अपंगत्वाचे वैद्यकीय प्रमाणपत्र निर्गमित करणेबाबत या विभागाच्या क्र.अपंग-२००९/प्र.क्र.५९/सुधार-३, दिनांक १६ मे,२००९ चे शासन परिपत्रक अधिक्रमित करण्यात येत आहे. त्याऐवजी शासनाने पुढील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

३. अपंग व्यक्तीसाठींच्या राखीव पदावर सरसकट ४०% किंवा त्यापेक्षा जास्त अपंगत्व असणा-या उमेदवारांची नियुक्तीसाठी निवड केली जाते.परंतु असा उमेदवार त्या पदावर त्याच्या अपंगत्वाच्या टक्केवारीनुसार काम करण्यास पात्र आहे किंवा नाही हे वैद्यकीय मंडळाने न ठरवता त्यांनी फक्त अपंगत्वाच्या टक्केवारीची तपासणी करून तशी टक्केवारी नमुद करावी व सर्वसाधारण वैदयकीय तपासणीनुसार तो उमेदवार शारिरीकदृष्टया पात्र (Fit) आहे किंवा नाही (Unfit) असे प्रमाणपत्रात नमूद करावे. तसेच अपंगाच्या पदांची जाहीरात देताना त्या पदाची कर्तव्ये व जबाबदा-या त्याचप्रमाणे अपेक्षित शारीरीक क्षमता/पात्रता याविषयी जाहिरातीत खुलासा करावा.

४. सदरहू शासन निर्णय सर्व मंत्रालयीन विभागांनी आपल्या नियंत्रणाखालील सर्व कार्यालयांच्या निदर्शनास आणावा.

५. सदर शासन निर्णय सामान्य प्रशासन विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत असून तो महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक **२०१००८०३१६१००२००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**( सतीश गवई )**
**प्रधान सचिव,महाराष्ट्र शासन.**

प्रति :-
सर्व अप्पर मुख्य सचिव /प्रधान सचिव / सचिव मंत्रालयीन प्रशासकीय विभाग

(कृ.मा.प.)

सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, बँक ऑफ इंडिया बिल्डींग,हुतात्मा चौक,मुंबई (पत्राने )
सर्व विभागीय आयुक्त
आयुक्त,अपंग कल्याण, महाराष्ट्र राज्य,पुणे
संचालक, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य,पुणे
संचालक, वि.जा.भ.ज. व इ.मा.व. संचालनालय,पुणे
सर्व जिल्हाधिकारी
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी
सर्व जिल्हा शल्य चिकित्सक / सर्व शासकीय वैद्यकीय महाविद्यालयाचे अधिष्ठाता
सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी
सर्व विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी
सर्व समाजकल्याण अधिकारी,जि.प.
विभागातील सर्व कार्यासने
निवड नस्ती-सुधार-३